**संगीतसूर्य केशवराव भोसले यांच्या जन्मदिनानिमित्त सांस्कृतिक कार्यक्रमाचे आयोजन व त्यावरील खर्चास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याबाबत**

# महाराष्ट्र शासन

**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**

**शासन निर्णय क्र. संकीर्ण ८२२३ /प्र.क्र.५२७/सां.का.४**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : २३ ऑगस्ट, २०२३

**वाचा :-** सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्र.सां.का.सं./ ४१४१, दिनांक २४ जुलै, २०२३.

**प्रस्तावना :-**

"स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव" या उपक्रमाच्या निमित्ताने विविध कार्यक्रमांचे आयोजन करण्यात येत आहे. सदर कार्यक्रम हे कला व कलेशी संबंधित मान्यवरांच्या हिरक, सुवर्ण व शताब्दी वर्षाच्या औचित्यावर त्यांचा गौरव व्हावा आणि त्या कलाकृतींचा तरुण रंगकर्मींच्या माहितीसाठी प्रचार व प्रसार व्हावा या हेतूने त्यांच्या संबंधीचे सांस्कृतिक कार्यक्रमाचे आयोजन करण्यात येत असते. याच पार्श्वभुमीवर, संगीतसूर्य केशवराव भोसले यांच्या जन्मदिनानिमित्त त्यांच्याशी निगडीत "संगीत संयुक्त मानापमान" या नाटकाचा प्रयोग, छायाचित्रांचे प्रदर्शन, तसेच संगीतसूर्य केशवराव भोसले यांच्या नाटकांतील गाजलेली पदे व नाट्यप्रवेश या विशेष सांस्कृतिक कार्यक्रमाचे आयोजन दिनांक ८, ९ व १० ऑगस्ट, २०२३ या कालावधीत कोल्हापूर येथे झाले आहे. सदर कार्यक्रम व त्यावरील आयोजन खर्चास प्रशासकीय व वित्तिय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

संगीतसूर्य केशवराव भोसले यांच्या जन्मदिनानिमित्त "संगीत संयुक्त मानापमान" या नाटकाचा प्रयोग, छायाचित्रांचे प्रदर्शन, तसेच त्यांच्या नाटकांतील गाजलेली पदे व नाट्यप्रवेश यांचा अंतर्भाव असणाऱ्या विशेष सांस्कृतिक कार्यक्रमाचे आयोजन व त्यावरील आयोजन खर्च रुपये १०,००,०००/- ( अक्षरी रुपये दहा लक्ष फक्त) इतक्या रकमेस या शासन निर्णयान्वये प्रशासकीय व वित्तिय मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर आयोजन खर्च मागणी क्र. झेडडी-२, २२०५, कला व संस्कृती, १०२, कला व संस्कृती प्रचालन, (०२) राज्य नृत्य, नाट्य, तमाशा व संगीत महोत्सव, (०२) (०२) राज्य कला संस्कृति जतन, संवर्धन विविध महोत्सव तसेच इतर कार्यक्रम (कार्यक्रम) (२२०५ १५०७) ५० इतर खर्च या लेखाशिर्षाखाली सन २०२३-२४ या वर्षासाठी मंजूर असलेल्या आर्थिक तरतूदीतून भागविण्यात यावा.

०३. यासाठी संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांना नियंत्रण अधिकारी तसेच लेखाधिकारी, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

०४. सदर खर्च वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/विनिमय, दिनांक १७ एप्रिल, २०१५, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला, उपविभाग-३, अ.क्र. ४ परिच्छेद क्र. २७ (२) (अ) अन्वये प्रशासकीय विभागास प्राप्त अधिकारानुसार मंजूर करण्यात येत आहे.

०५. सदर प्रकरणी वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२३/ प्र.क्र.४०/ अर्थ-३, दिनांक १२ एप्रिल, २०२३ मधील सर्व परिच्छेद व परिशिष्टातील अटींनुसार कार्यवाही करण्याची जबाबदारी संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई यांची राहील.

०६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२३०८२३१२३८४२५७२३ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

VILAS RAMRAO THORAT

Digitally signed by VILAS RAMRAO THORAT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT, 2.5.4.20=e6cc4d20348a52de465c7c34a61591bbe69b747ae11457103a0cfb9a57fc6ce6, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=CB03C92B399CC89310BF1378C184D97A4B7B9B98E926EA8E71DD7BC9CB273631, cn=VILAS RAMRAO THORAT
Date: 2023.08.24 15:40:29 +05'30'

**( विलास रा.थोरात )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मंत्री, सांस्कृतिक कार्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
२. मा. प्रधान सचिव (सांस्कृतिक कार्य) यांचे स्वीय सहाय्यक, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
३. उप सचिव ( सां.का.४ ) यांचे स्वीय सहाय्यक, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
४. संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, जुने सचिवालय इमारत, एम.जी. रोड, मुंबई ४०० ०३२
५. अवर सचिव( (अर्थसंकल्प), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
८. महालेखापाल (लेखा परीक्षा) - १ महाराष्ट्र, मुंबई
९. महालेखापाल (लेखा परीक्षा) - २ महाराष्ट्र, नागपूर
१०.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) - १ महाराष्ट्र , मुंबई
११.महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता) - २ महाराष्ट्र, नागपूर
१२.निवड नस्ती, सां.का.४